# आंधळा शिकारी

लेखन, चित्रे व सजावट : **क्रिस्टिना रोडनास**

अनुवाद : **सुजाता गोडबोले**



## लेखिकेचे टिप्पण

अलेक्झांडर मॅकॉल स्मिथ यांच्या ‘चिल्ड्रन ऑफ वॅक्स’ या आफ्रिकेतील लोककथांच्या संग्रहातील एका गोष्टीवरून ‘द ब्लाइंड हंटर’ या कथेची प्रेरणा मिळाली आहे.

आफ्रिकेच्या दक्षिणेकडील प्रदेशातील ही कथा आहे आणि यातील पात्रांची नावे ‘शोना’ या भाषेतील आहेत. ‘चिरोबो’ याचा अर्थ आहे, ‘बोलघेवडा’ आणि ‘प्राण्यांना सापळ्यात पकडणे’ या अर्थाच्या शब्दावरून ‘म्युताये’ हा शब्द आला आहे.

या गोष्टीतून मिळालेला महत्त्वाचा संदेश अनेक देशातील आणि निरनिराळ्या संस्कृतीत वाढलेल्या मुलांपर्यंत पोहोचेल आणि त्यांना आवडेल अशी मला आशा वाटते.

क्रिस्टिना रोडनास



काही वर्षांपूर्वी, आफ्रिकेत, गोल आकाराच्या झोपड्या असलेल्या एका खेड्यात चिरोबो  नावाचा एक माणूस आपल्या झोपडीत एकटाच राहत असे. दररोज तो आपल्या बागेत काम करत असे आणि आपल्या सूर्यफुलाची, भोपळ्याची आणि मक्याची मशागत करत असे. काम करता करता तो गातही असे आणि त्याचे गाणे ऐकण्यासाठी अनेक रंगाचे पक्षी मुद्दाम येत असत.



चिरोबो अतिशय हुशार आणि दयाळू म्हणून प्रसिद्ध होता. लोक आपले प्रश्न घेऊन मुद्दाम त्याच्याकडे येत असत कारण त्याची उत्तरे नेहमीच बरोबर असतात असा सर्वांचा विश्वास होता. मुले त्याला भेटायला आली की तो हातातले काम थांबवत असे म्हणजे त्याला त्यांच्या गोष्टी ऐकता येत आणि त्यांच्याबरोबर हसत-खेळत वेळ घालवता येई.

नेहमी हसतमुख असणारा हा मायाळू माणूस सर्व गावकऱ्यांनाही आवडत असे. त्याच्या  डोळ्याला दिसत नव्हते हे बहुधा कोणाच्या लक्षातही आले नव्हते.



एक दिवस संध्याकाळी चिरोबो रस्सा शिजवत बसला असताना एक परका माणूस त्याची बाग कौतुकाने बघत उभा राहिला होता. “तुझ्या बागेतील धान्य जितके सुंदर आहे तितकेच ते भरघोस देखील आहे!” तो न राहवून म्हणाला.

चिरोबोचा ऊर अभिमानाने भरून आला आणि त्याने पाहुण्याला विचारले की तो दूरवरून आला होता का. पाहुण्याने सांगितले की तो शिकारीसाठी चालला होता, त्याचे नाव होते म्युताये आणि त्याचे गाव पश्चिमेकडे अर्ध्या दिवसाच्या अंतरावर होते.

“मी घरी जाईन तेव्हा माझ्या पाठीवरच्या पिशवीत लठ्ठ पक्षी असतील,” त्याने फुशारकी मारली. “मग गावात माझे कौतुकाने स्वागत होईल.”

“मला जेव्हा चांगले दिसत असे, तेव्हा मी देखील एक शिकारी होतो,” चिरोबो म्हणाला. “इथे थोडा वेळ बस आणि मी केलेल्या या रश्याची जरा चव तर बघ. शिवाय आपल्याला छान गप्पाही मारता येतील.”

म्युतायेला ही कल्पना आवडली आणि तो चिरोबो सोबत त्याच्या चुलीजवळ जाऊन बसला. अनेक तास ते गप्पा मारत, हसत आणि गाणी गात बसले.





चंद्र जेव्हा दूरवरच्या झाडाच्या  शेंड्यावर पोचला, तेव्हा पाहुणा उठून उभा राहिला.

“मित्रा, तुझ्या पाहुणचाराबद्दल खूप धन्यवाद,” तो म्हणाला. “याच्या बदल्यात मी तुझ्यासाठी काय करू?”

थोडा वेळ चिरोबो विचारात पडला. मग त्याने उत्तर दिले,  “मला तुझ्याबरोबर शिकारीला जायला खूप आवडेल.”

म्युताये  हसला आणि म्हणाला, “ज्याला दिसत नाही अशा माणसाबरोबर शिकारीला जायला मला नाही आवडणार.”

“तुला माझा काहीच त्रास होणार नाही,” चिरोबोने विश्वासाने त्याला सांगितले. “मला डोळ्याखेरीज इतर प्रकारांनी पाहता येते.”

“ठीक तर मग. उद्या सकाळी सूर्य उगवण्याच्या वेळी आपण शिकारीला निघू. माझा एक सापळा तू वापर. त्यात जे काही मिळेल, ते तुझं,” म्युताये म्हणाला.



दुसऱ्या दिवशी पहाटेच्या पहिल्या किरणांबरोबर ते दोघे जंगलात निघाले. म्युताये एका लांबलचक काठीचे एक टोक धरून पुढे चालत होता. आणि काठीचे दुसरे टोक हातात धरून चिरोबो त्याच्यामागे चालत होता. वाकड्या तिकड्या झाडांमधून, वळणा-वळणाच्या एका अरुंद वाटेवरून ते चालत गेले.



अचानक, चिरोबोने आपल्या हातातील काठीचे टोक मागे ओढले. तो पुतळ्यासारखा उभा राहिला आणि दोन्ही हात कानामागे घेऊन लक्षपूर्वक ऐकू लागला. “आता नीट काळजीपूर्वक चालायला हवे,” तो हळूच कुजबुजला. “इथे जवळच कुठेतरी बिबट्या आहे.”

म्युतायेने सावधपणे सगळीकडे पाहिले पण त्याला बिबट्या कुठेच दिसला नाही.

त्याने सहज वर पाहिले, तेव्हा एका आकृतीने त्याचे लक्ष वेधले.

वाटेच्या वरच्या बाजूला बाभळीच्या एका फांदीवर एक मोठा बिबट्या झोपलेला होता.

बिबट्यापासून पुरेसे दूर गेल्यावर म्युतायेने विचारले, “ज्याच्या डोळ्यासमोर नेहमी अंधार असतो, त्याला बिबट्या जवळ आहे हे कसे काय कळले?”

चिरोबोने सहजपणे उत्तर दिले, “मला माझ्या कानांनी पाहता येते.”



थोडा वेळ ते दोघे काही न बोलता दाट  जंगलातून जात राहिले.  खळाळत्या  झऱ्याच्या आवाजाबरोबरच थंड वारा वाहत होता. चिरोबोने परत एकदा काठीला एक हिसका दिला आणि तो जागेवरच उभा राहिला. मान वाकडी करून त्याने एक दीर्घ श्वास घेतला.

“आपण आता सावध असायला हवे. जवळच एक रानडुकरांचा कळप आहे.” चिरोबोने सावध केले.

म्युतायेने सगळ्या बाजूंना पाहिले पण त्याला काहीच दिसले नाही.

तो घाईघाईने जवळच्याच एका टेकडीवर चढला आणि त्याने झुडुपातून वाकून पाहिले. आश्चर्य  म्हणजे, रानडुकरांचा एक कळप पळत येत असलेला त्याला दिसला, त्यांचे टोकदार सुळे माध्यान्हीच्या सूर्यप्रकाशात चांगले चमकत होते.

रानडुकरांपासून बरेच दूर गेल्यावर म्युतायेने विचारले, “डोळ्यासमोर नेहमी काळोख असणाऱ्याला रानडुकरे येत आहेत हे कसे काय समजले?”

आंधळा शिकारी हसला आणि त्याने उत्तर दिले, “मला नाकाने देखील पाहता येते.”



भरपूर काटे आणि सुगंधी फुलांचा दरवळ पसरलेल्या एका मोठ्या दरीतून ते पुढे गेले. परत एकदा, चिरोबोने काठीला एक हिसका दिला आणि तो थांबला. रांगत असल्याप्रमाणे तो गुडघ्यावर टेकला आणि आपले हात त्याने जमिनीवर टेकवले.

“सावध राहायला हवे, गेंडे याच बाजूला येत आहेत,” चिरोबो हळूच म्हणाला.

म्युतायेने झाडीतून सगळीकडे पाहिले, पण त्याला गेंडे कुठेच दिसले नाहीत.

सावधगिरीने झाडे थोडी बाजूला करून त्याने परत एकदा सर्व परिसरावर नजर टाकली. अचानक, उंच वाढलेल्या गवतातून दोन गेंडे पळत असलेले त्याला दिसले.

दोन्ही शिकारी जेव्हा गेंड्यांपासून पुरेसे दूर होते, तेव्हा तरुण शिकारी परत एकदा त्याच्या मित्रासमोर उभा राहून म्हणाला, “ज्याच्या डोळ्यासमोर सदैव अंधार असतो, त्याला गेंडे पळत येत आहेत हे कसे समजले?”

चिरोबोने शांतपणे उत्तर दिले, “माझ्या त्वचेमार्फत कसे बघायचे ते मला कळते.”

दोन्ही शिकारी दरीत खोलवर चालत गेले आणि एका उथळ तळ्याशी थांबले. काठावरच्या  चिखलावर असंख्य पक्ष्यांच्या पावलांचे ठसे उमटले होते.

“पक्षी इथे पाणी पिण्यासाठी येत असणार, सापळे लावण्यासाठी ही योग्य जागा आहे.” म्युतायेने आपले निरीक्षण सांगितले.

आपल्या मित्राच्या सूचनेनुसार चिरोबोने आपला सापळा तळ्याच्या किनाऱ्याशी लावला आणि त्याच्या तरुण मित्राने आपला सापळा थोड्या अंतरावर लावला. दोन्ही सापळे दिसणार नाहीत अशा तऱ्हेने त्यांच्यावर पाने वगैरे लावल्यानंतर म्युताये म्हणाला, “आपण जवळच कुठेतरी राहू आणि उद्या सकाळी परत येऊ. आपल्याला काय मिळते ते तेव्हा पाहू.”

त्या रात्री देखील त्यांनी खूप गप्पा मारल्या. म्युतायेला दृष्टिहीन म्हाताऱ्या शिकाऱ्याच्या  शहाणपणाचे फार कौतुक वाटले आणि बरीच वर्षे सतावणारे अनेक प्रश्न त्याने त्याला विचारले.



दुसऱ्या दिवशी सकाळी ते सापळे लावलेल्या ठिकाणी परत आले. त्यांची शिकार यशस्वी झाली होती हे चिरोबोच्या लगेच लक्षात आले. उल्हसित होऊन तो म्हणाला, “आपल्या सापळ्यात पक्षी सापडले आहेत. मला त्यांचा आवाज येतो आहे.”

तरुण शिकाऱ्याने प्रथम आपला सापळा पाहिला आणि त्यात त्याला एक लहानसा, हडकुळा पक्षी आढळला. तो जरी निराश झाला असला, तरी त्याने तो पक्षी काळजीपूर्वक बाहेर काढून कातडी पिशवीत ठेवला. मग तो दुसऱ्या सापळ्याकडे गेला.

खाली वाकून तो सापळ्यात पाहू लागला तेव्हा त्याला फार हेवा वाटला. आंधळ्या शिकाऱ्याच्या सापळ्यात एक मोठे गुबगुबीत बदक अडकले होते. इतके मोठे की एखाद्या भुकेल्या कोल्ह्याचेही त्याने पोट भरले असते.



काही क्षण म्युताये संभ्रमात पडला, दोन्ही पक्षी पाहून त्याने विचार केला, “ज्याच्या डोळ्यासमोर कायम काळोख असतो, त्याला आपला पक्षी कोणता हे कसे काय समजेल?”

मनाशी काहीतरी ठरवून त्याने लठ्ठ पक्ष्याच्या जागी छोटा पक्षी ठेवला.

“तुला मिळालेला पक्षी माझ्या पक्ष्यापेक्षा मोठा आहे. त्याने तुझे चांगले पोटभर जेवण होईल,”  असे म्हणत त्याने छोटा पक्षी आपल्या सोबत्याला दिला.

चिरोबोने पक्षाच्या पंखावरून हात फिरवला आणि बोटाने त्याची हडकुळी पाठ आणि छाती चाचपली. काही न बोलता त्याने पक्षी आपल्या पिशवीत ठेवून दिला.

मग दोघांनी आपले सापळे काढले आणि गावाकडे चालायला सुरुवात केली.





ते दोघे बराच वेळ काही न बोलता चालत राहिले.  मग थोडी विश्रांती घेण्यासाठी ते एका मोठ्या झाडाखाली थांबले. म्युतायेला काल रात्री राहिलेले काही प्रश्न विचारायचे होते. म्हणून ही  संधी साधून लहानपणापासून त्याला सतावत असणारा एक प्रश्न त्याने आपल्या वयस्क मित्राला विचारला.

“लोक एकमेकांशी का भांडतात?” त्याने विचारले.

बराच वेळ चिरोबो विचारात पडला. मग जेव्हा तो बोलू लागला, तेव्हा त्याचा आवाज अतिशय दु:खी होता.

तो संथपणे म्हणाला, “जे आपले नाही ते इतरांकडून घेण्याचा लोक प्रयत्न करतात म्हणून त्यांची भांडणे होतात. माझ्यासोबत तू आता तेच केले आहेस.”



चिरोबोचे उत्तर ऐकून तरुण शिकारी थक्क झाला. त्याने बोलायचा प्रयत्न केला पण त्याच्या तोंडून शब्द फुटेना. अतिशय शरमिंदे होत त्याने आपली पिशवी जवळ घेतली आणि त्यातून मोठे बदक बाहेर काढले आणि ते हळूच आंधळ्या शिकाऱ्याच्या हातात ठेवले.

पश्चात्तापाने भरलेल्या हलक्या आवाजात तो म्हणाला, “एखाद्या दुष्ट माणसाला त्याच्या मित्राकडून क्षमा कशी मिळवता येईल?”

चिरोबोचे दृष्टिहीन डोळे तरुण शिकाऱ्याच्या मनात खोलवर पाहत असल्यासारखे दिसत होते. तो म्हणाला, “आपल्या हृदयाच्या डोळ्यांनी पाहून! आता तू तेच तर केले आहेस!”

